**कौटुंबिक न्यायालय, पुणे यांना प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदी करण्याकरिता रु.१२,३५,५००/- इतक्या रक्कमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : संप्रिसा- २०२४/प्र. क्र. ०६/का. ७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ:-** १) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/६०/२०२४, दिनांक १४/०२/२०२४ दि. ०२/०४/२०२४.

२) समक्रमांक दिनांक ११/०६/२०२४ रोजीचे पत्र.

३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Spl/Comp/२८४/२०२४, दिनांक २६/०७/२०२४.

४) विभागाच्या दिनांक १६/०८/२०२४ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

<u>प्रस्तावना</u> :-

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी कौटुंबिक न्यायालय, पुणे यांना प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदी करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक १ अन्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे अभिप्राय घेण्यात आले असून, संदर्भ क्रमांक २ अन्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांना पत्रान्वये कळविण्यात आले. त्यानुसार संदर्भ क्रमांक ३ अन्वये माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने दिलेल्या अभिप्रायानुसार प्रस्ताव सादर करण्यात आला. सदर प्रस्तावास संदर्भ क्रमांक ४ अन्वये विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १६/०८/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आली. यानुषंगाने कौटुंबिक न्यायालय, पुणे यांना प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदी करण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय**</u> :-

कौटुंबिक न्यायालय, पुणे यांना प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदी करण्याकरिता **रु.१२,३५,५००/-** (अक्षरी रुपये बारा लक्ष पस्तीस हजार पाचशे फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. कौटुंबिक न्यायालय, पुणे यांचे प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | संगणक सामग्री | संख्या | दर रु. | एकूण रुपये |
|---|---|---|---|---|
| १. | प्रिंटर्स | २५ | ४७,९००/- | ११,९७,५००/- |
| २. | युपीएस | २० | १९००/- | ३८,०००/- |
| | | | **एकूण रु.** | **१२,३५,५००/-** |

३. प्रिंटर्स व संगणकांसाठी युपीएस खरेदी ही उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४/०८/२०१७ व ०८/१२/२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार GeM पोर्टलवरुन शासनाच्या विहित पध्दतीने करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधि व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली १७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२९१५२२०९३९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GIRISH RAMLING SAGANE

Digitally signed by GIRISH RAMLING SAGANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=8a9b5d43113d71f5bfc96922b7f43ac6c2848591ed3e1f34019d8b33a3cdb267, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=17189CF8C13CB2294570F54627B6E879FDC09820CCBF3380ED23DA0258EA27C8, cn=GIRISH RAMLING SAGANE
Date: 2024.08.29 15:36:50 +05'30'

**( गि. रा. सगणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

३. प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, पुणे.

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

५. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,

९. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

१०. अधिदान व लेखा अधिकारी, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड, के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

११. संचालनालय, लेखा व कोषागारे, ६ व ७ वा मजला अेपीजे हाऊस, दिनशॉ वांच्छा रोड,के. सी. कॉलेज जवळ,चर्चगेट, मुंबई-२०.

१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

१३. कार्यासन अधिकारी १३, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४. निवड नस्ती/का. ७